उप जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांना पदस्थापना देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्र. टिआरएफ-०५२५/प्र.क्र. १४३/८/ई-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १२ जून, २०२५

**संदर्भ:-** १. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२. सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/ प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३. शासनाचे सम क्रमांकाचे दि.११.०६.२०२५ रोजीचे आदेश.

**शासन आदेश :-**

संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन आदेशान्वये खाली नमुद उप जिल्हाधिकारी संवर्गातील प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून त्यांच्या सेवा महसूल व वन विभागात प्रत्यावर्तित करण्यात आल्या आहेत. सदर अधिकारी महसूल व वन विभागात रूजू झाले असून महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार **उप जिल्हाधिकारी संवर्गातील खालील अधिका-याची प्रशासकीय कारणास्तव** त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | प्रतिनियुक्तीवरील पद | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १. | श्री. दादासाहेब गिते | विभाग प्रमुख, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे (बार्टी) | निवासी उप जिल्हाधिकारी, अहिल्यानगर, जि. अहिल्यानगर. |

२. उपरोक्त नमूद उप जिल्हाधिकारी यांना पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्याकरीता दिनांक १२.०६.२०२५ (म.नं.) पासून सध्याच्या कार्यरत पदावरुन कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबधित अधिकारी यांनी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत रूजू अहवालाची प्रत https://maharevenuehr.in या पोर्टलवर अपलोड करावी.

३. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू

न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा “अकार्यदिन” (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०६१२१३३५२६७९१९ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=3E782C1E59ACD749FC48C691D7A8C477D6AC39C1904204F442B52D728D48A67A, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF80F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2025.06.12 13:36:35 +05'30'

**( सुधाकर यादव )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग.
२. श्री. दादासाहेब गिते, उप जिल्हाधिकारी.

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
६. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. संबंधित जिल्हाधिकारी
८. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
११. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
१२. उप सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. निवडनस्ती (कार्यासन ई-२).